महाराष्ट्र नागरी सेवा [वर्तणूक] नियम, १९७९ - शासकीय कर्मचा-यांच्या शासनमान्य संघटनांची लेखा परीक्षा पुस्तके [हिशेब], नोंद वह्या, व दप्तर तपासणीबाबत —

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक आरजीए-१०८४/सीआर-९९/१६-अ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० डिसेंबर १९८४.

प रि प त्र क

शासकीय कर्मचा-यांच्या संघटनांना [औपोचिक्तार] महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २९, तसेच त्यासोबतच्या परिशिष्टात उल्लेखिलेल्या नियमान्वये मान्यता दिली जाते. या परिशिष्टातील नियम ६ व ७ [प्रत सोबत जोडली आहे] अन्वये मान्यता-प्राप्त संघटनांनी त्यांची कार्यवृत्त पुस्तके [ Minute books ] सदस्यांची नोंदवही, लेखा-पुस्तके, प्रमाणपत्रे आणि इतर कागदपत्रे शासनाने अधिकृत केलेल्या अधिका-यास तपासणीसाठी उपलब्ध करावयाची असतात. त्याचप्रमाणे वार्षिक लेखा अहवाल-विवरणपत्र, सभासदांच्या नोंदणीबाबतची माहिती संघटनांनी संबंधित विभागाच्या सचिवांकडे पाठवावयाची असते.

या संदर्भात अशी विचारणा झाली आहे की, कर्मचाऱ्यांच्या शासन मान्यताप्राप्त संघटनांची कार्यवृत्त-पुस्तके, सदस्यांची नोंदवही, लेखा पुस्तके आणि इतर कागदपत्रे तपासणीसंबंधी कोणत्या अधिकाऱ्यास सक्षम अधिकारी मानावे. याबाबत शासन असा खुलासा करीत आहे की, शासन मान्यताप्राप्त संघटना ज्या प्रशासकीय विभागांशी संलग्न असतील त्या त्या मंत्रालयीन विभागांचे सचिव अशा संघटनांचे दप्तर तपासणी वगैरेबाबत सक्षम अधिकारी राहतील. तसेच संबंधित विभागांचे सचिव आपल्या विभागातील अधिकाऱ्यास [जो उप सचिवांचे दर्जाच्या अधिकाऱ्यापेक्षा कनिष्ठ नाही] या कार्यासाठी नामनिर्देशित करू शकतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

कृ. स. मोकाशी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
शासकीय कर्मचाऱ्यांच्या सर्व शासन मान्यताप्राप्त संघटना.

६. मान्यताप्राप्त संघटनेचे कार्यवृत्त-पुस्तक, सदस्यांची नोंदवही, लेखा पुस्तके आणि प्रमाणके आणि इतर सर्व कागदपत्रे, यासंबंधात शासनाने प्राधिकृत केले असेल अशा कोणत्याही अधिकाऱ्यांना तपासणीसाठी खुली ठेवली पाहिजेत.

७. प्रत्येक मान्यताप्राप्त संघटनेने, शासन यासंबंधात प्राधिकृत करील अशा अधिकाऱ्याने आवश्यक म्हणून ठरवून दिलेल्या तारखेपर्यन्त संबंधित विभागाच्या सचिवाला, आपल्या सदस्यांचे वार्षिक विवरणपत्र आणि लेखापरीक्षित लेख्यांची प्रत सादर केली पाहिजे.

---

एच-६२८[बी][४,०००-१-८५]